कुमार विश्वकोश बोलक्या स्वरूपात करण्यासाठी येणाऱ्या ध्वनीमुद्रणाच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुविखं-२०१४/प्र.क्र.८४/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगूरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १७ नोव्हेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळामार्फत राबविण्यात येणाऱ्या मुलांचा विश्वकोश या योजनेंतर्गत "बाल विश्वकोश" व "कुमार विश्वकोश" प्रत्येकी १२ खंडात प्रकाशित करण्यात येणार आहेत. सदर खंडापैकी कुमार विश्वकोश जीवसृष्टी व पर्यावरण खंड-२, भाग-२ बोलक्या स्वरूपात करण्याचे काम नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड, मुंबई या सेवाभावी संस्थेमार्फत करण्यात येणार आहे. सदर खंडाच्या ध्वनीमुद्रणासाठी येणाऱ्या दरदिन रू.६००/- प्रमाणे ३० दिवसासाठी रू.१८,०००/- इतक्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा खर्च सन २०१४-२०१५ मध्ये विश्वकोश निर्मिती मंडळाच्या मंजूर तरतूदीतून मागणी क्रमांक झेडएफ - ०२, प्रधानशीर्ष - २२०५- कला व संस्कृती, १०२- कला व संस्कृती प्रचालन (०२) (०३) मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे विकास कार्यक्रम (२२०५ ३२२३) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर बाबी) या लेखाशीर्षाखाली भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

कुमार विश्वकोशाचे यापुढील खंड बोलके करण्याचे काम नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड, मुंबई या सेवाभावी संस्थेमार्फत करण्यास व यासाठी प्रतिवर्षी येणाऱ्या ध्वनीमुद्रणाच्या खर्चाकरीता रू.१.०० लक्ष (रू.एक लक्ष फक्त) या मर्यादेत खर्च करण्याचे अधिकार मा.सचिव, मराठी भाषा यांना प्रदान करण्यात येत आहेत. सदर खर्च महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या त्या त्या वित्तीय वर्षात मंजूर होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभाग/व्यय-४ यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८९८/१४/व्यय-४, दि.२९.९.२०१४, वित्त विभाग/अर्थ-१४ यांच्या दि.०४.१०.२०१४ तसेच वित्त विभाग/विनियम अनौपचारीक संदर्भ क्र.५५२/१४/विनियम, दि.२१.१०.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११८१५४९१०५७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2014.11.18 15:57:49 +05'30'

**( वृषाली व. सावंत )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ,मुंबई
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा परिक्षा /लेखा अनुज्ञेयता), मुंबई,
४) महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा परिक्षा /लेखा अनुज्ञेयता), नागपूर,

५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६) महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), महाराष्ट्र , मुंबई
७) संचालक, नॅशनल असोसिएशन ऑफ ब्लाईंड, वरळी सी-फेस, मुंबई-४०० ०३०.
८) निवड नस्ती.